महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ
मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील
बदल्या / पदस्थापना

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन आदेश क्रमांकः पदस्था-२०१७/प्र.क्र.६३/सेवा-२**

गो.ते.रुग्णालय इमारत, १० मजला, ए विंग,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
तारीख: ०३ मे, २०१७

**वाचा :-** मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांनी रिट पिटीशन क्रमांक ९७०७/२०१६ प्रकरणी दिनांक ०९.०२.२०१७ रोजी दिलेले आदेश.

**शासन आदेश -**

उपरोक्त वाचा येथील आदेशास अनुसरुन, महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ, वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे रु.६६०० मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील डॉ.सुहास जगताप यांची प्रतिनियुक्तीने औरंगाबाद महानगरपालिकेच्या आरोग्य वैद्यकीय अधिकारी या पदावर शासन आदेश क्रमांक बदली-१३१५/प्र.क्र.३४६/(१२)/सेवा२, दि.३०.०९.२०१५ अन्वये केलेली पदस्थापना रद्द करुन, आता महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४)(दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार त्यांची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १ | डॉ. सुहास जगताप, आरोग्य वैद्यकीय अधिकारी, औरंगाबाद महानगरपालिका, औरंगाबाद | वैद्यकीय अधीक्षक, उपजिल्हा रुग्णालय, वैजापूर, जिल्हा औरंगाबाद ( रिक्तपदी ) |

२. डॉ.जगताप यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांना व शासनास सादर करावा.

३. डॉ.जगताप यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. डॉ.जगताप यांनी नवीन पदस्थापनेवर तात्काळ रुजू व्हावे, पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहील्यास त्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. डॉ.जगताप हे पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न झाल्यास त्यांचेविरुध्द संचालनालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही प्रकारे प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१७०४२०१४०७३९४७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2017.05.03 11:21:48 +05'30'

(वि. पुं. घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई,
२) आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका, औरंगाबाद,
३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई,
५) उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद,
६) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, औरंगाबाद,
७) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
१०) मा. मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक
११) मा. मंत्री (आरोग्य)/ मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१२) मा. अपर मुख्य सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक
१३) डॉ. सुहास जगताप, वैद्यकीय अधीक्षक (संचालक, आरोग्य सेवा, संचालनालय, मुंबई यांचेमार्फत)
१४) निवड नस्ती (सेवा - २ )